**सन २०१५-१६ मध्ये "रस्ते व पूल" या उपशिर्षाखाली राज्यस्तरावर अर्थसंकल्पीत करण्यांत आलेल्या तरतूदीचे जिल्हानिहाय वाटप...**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : आविवि-२०१५/प्र.क्र. ६८/ का.५**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनाक : ०६ नोव्हेंबर, २०१५

**शासन निर्णय :-**

सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात "रस्ते व पुल" या उपशिर्षाखाली राज्यस्तरीय कामांसाठी मार्च, २०१५ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात रु.१९०००.०० लक्ष तर जुलै, २०१५ च्या पावसाळी अधिवेशनात रु.६५००.०० लक्ष असा एकूण रु.२५५००.०० लक्ष चा नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यांत आला आहे. सदर अर्थसंकल्पीत नियतव्ययापैकी वितरणासाठी उपलब्ध असलेल्या निधीतून रु. **१२७५०.००** लक्ष इतक्या निधीचे खालील तकत्यात दर्शविल्याप्रमाणे जिल्हानिहाय वाटप करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यांत येत आहे.

**मागणी क्र- टी -६** ५०५४, मार्ग व पूल यांवरील भांडवली खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०४- जिल्हा व इतर मार्ग, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०७) जिल्हा व इतर मार्ग (राज्यस्तर योजना), (५०५४ ५११७), ५३ मोठी बांधकामे

| अ.क्र. | जिल्हयाचे नांव | सन २०१५-१६ मधील निधी वाटप (रु.लक्ष) | नियंत्रक अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | ठाणे | ९६१.७२ | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे |
| २ | पालघर | ३४३८.८४ | |
| ३ | धुळे | ४८०.९६ | अधीक्षक अभियंता ,सार्वजनिक बांधकाम मंडळ ,धुळे |
| ४ | नंदुरबार | २०२५.५५ | |
| ५ | नाशिक | १७९८.३२ | अधीक्षक अभियंता ,सार्वजनिक बांधकाम मंडळ ,नाशिक |

| | | | |
|---|---|---|---|
| ६ | नागपूर | ५५३.४७ | अधीक्षक अभियंता ,सार्वजनिक बांधकाम मंडळ ,नागपूर |
| ७ | गोंदिया | ३०६.१३ | |
| ८ | गडचिरोली | ७८९.५६ | अधीक्षक अभियंता ,सार्वजनिक बांधकाम मंडळ ,गडचिरोली |
| ९ | चंद्रपूर | ३९६.७५ | अधीक्षक अभियंता ,सार्वजनिक बांधकाम मंडळ ,चंद्रपूर |
| १० | वर्धा | १२०.०० | |
| ११ | नांदेड | ४४०.८७ | अधीक्षक अभियंता ,सार्वजनिक बांधकाम मंडळ ,नांदेड |
| १२ | यवतमाळ | ३३६.०७ | अधीक्षक अभियंता ,सार्वजनिक बांधकाम मंडळ ,यवतमाळ |
| १३ | जळगांव | २२८.२५ | अधीक्षक अभियंता ,सार्वजनिक बांधकाम मंडळ ,जळगांव |
| १४ | अहमदनगर | २२३.३० | अधीक्षक अभियंता ,सार्वजनिक बांधकाम मंडळ ,अहमदनगर |
| १५ | अकोला | ५.५० | अधीक्षक अभियंता ,सार्वजनिक बांधकाम मंडळ ,अकोला |
| १६ | बुलढाणा | २१२.५० | |
| १७ | रायगड | २१७.०० | अधीक्षक अभियंता ,सार्वजनिक बांधकाम मंडळ ,रायगड |
| १८ | पुणे | २१५.२१ | अधीक्षक अभियंता ,सार्वजनिक बांधकाम मंडळ ,पुणे |
| | **एकूण** | **१२७५०.००** | |

२. वरीलप्रमाणे वाटपास मंजूरी देण्यात आलेला निधी रस्ते/पुलांच्या जुन्या व नविन कामाकरिता वाटप करण्यांस मान्यता देण्यांत येत आहे.

३. आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २०१५-१६ या चालू आर्थिक वर्षाकरीता उपलब्ध करून दिलेली तरतूद खालील नमुद केलेल्या अटीं विचारात घेवुन वाटप करण्यात यावा.

(अ) संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, यांचेकडून रस्त्याची कामे आदिवासी उपयोजना क्षेत्रात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घेऊन व रस्त्याच्या कामांना प्रशासकीय मान्यता मिळाल्याची खात्री करुनच तरतूद वितरीत करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील.

(ब) सन २०१५-१६ या चालू आर्थिक वर्षात उपलब्ध करून दिलेल्या निधी पेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी व सर्व संबंधितांना निर्देश द्यावेत. याची पुर्ण जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी यांची राहील.

४. वरीलप्रमाणे वाटप करण्यांत आलेल्या निधीमधून नव्याने हाती घ्यावयाची कामे विहित नियमानुसार निविदा प्रक्रिया (ई-टेंडरींग) चा अवलंब करुन हाती घेण्यांत यावीत.

५. नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील मान्यता असलेल्या रस्त्यांच्या कामावर खर्च होतील याची दक्षता घ्यावी.

६. या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

७. या शासन निर्णयाद्वारे वाटप करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

८. आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये.

९. जर आदिवासी उपयोजनेत केलेली तरतूद खर्च झाली नाही तर सदर तरतूद प्रत्यार्पित करावी व कोणत्याही परिस्थितीत आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च करण्यात येवू नये.

१०. आदिवासी उपयोजनेची तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च झालेली आढळल्यास याबाबत संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प व संबंधित अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांना जबाबदार धरण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०६१२३५१५९७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

Laxmikant G Dhoke

Digitally signed by Laxmikant G Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Laxmikant G Dhoke
Date: 2015.11.06 12:36:30 +05'30'

**( ल. गो. ढोके )**

**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा. मंत्री (आवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.

२. मा. राज्यमंत्री ( आवि ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.

३. महालेखापाल -१ (लेखा परिक्षा ), (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई

४. महालेखापाल -२ (लेखा परिक्षा ), (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर

५. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक

६. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन व विकास मंडळ, नाशिक/पालघर/नंदुरबार

७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक/पालघर/नंदुरबार

८. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ठाणे

९. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक/ शहापूर/ जव्हार/ डहाणू/ नंदुरबार/ तळोदा

१०.जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा नाशिक/पालघर/नंदुरबार

११.आदिवासी विकास विभाग (कार्यासन -६ ) मंत्रालय, मुंबई

१२.निवड नस्ती-का.५.